आदिवासी विकास विभागामधील आश्रमशाळा/ वसतीगृहामधील रोजंदारी/ तासिका तत्वावरील कर्मचाऱ्यांना शासन सेवेत नियमित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : न्यायाप्र-२२२१/प्र.क्र.२००/का.१५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: १२ एप्रिल, २०२२

**प्रस्तावना :-**

आदिवासी विकास विभागाच्या अधिनस्त विभागीय स्तरावर अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, ठाणे, नागपूर व अमरावती अशी एकूण चार विभागीय कार्यालये असून एकुण ३० प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प कार्यालये कार्यरत आहेत. आदिवासी विकास विभागाअतंर्गत ४९९ शासकीय आश्रमशाळा कार्यरत आहेत.

सद्य:स्थितीत शिक्षक संवर्गातील ६२०९ मंजूर पदांपैकी ४००६ एवढी पदे भरलेली असून २२०३ एवढी पदे रिक्त आहेत. तसेच वर्ग ४ च्या ६१०० मंजूर पदांपैकी ३२३७ एवढी पदे भरलेली असून २८६३ एवढी पदे रिक्त आहेत. आदिवासी विकास विभागांतर्गतच्या कार्यरत आश्रमशाळा या अत्यंत दुर्गम व डोंगराळ भागात आहेत. दुर्गम, अतिदुर्गम व डोंगराळ भागात सुरु असलेल्या आदिवासी विकास विभागाच्या आश्रमशाळांमधील पदे रिक्त राहिल्यामुळे अशा क्षेत्रातील आदिवासी आश्रमशाळांमधील विद्यार्थ्यांना शैक्षणिक सुविधा पुरवण्यामध्ये विभागाला मोठया प्रमाणावर अडचणींना तोंड द्यावे लागते. तसेच सदर आश्रमशाळांमधील माध्यमिक व उच्च माध्यमिक वर्गांसाठी आवश्यकतेप्रमाणे विषयनिहाय तज्ञ शिक्षक आवश्यक असल्याने उपलब्ध शिक्षकांकडून शिकविण्याचे काम करुन घेणे शक्य होत नाही.त्यामुळे शिक्षणाचे व विद्यार्थ्यांना सुविधा पुरविण्याचे काम नियमितपणे सुरु राहण्यासाठी व अशा आश्रमशाळांमधील रिक्त पदांमुळे विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान होऊ नये म्हणून विषयनिहाय आवश्यकतेप्रमाणे शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची तासिका तत्वावर/मानधनावर नियुक्ती संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास/प्रकल्प अधिकारी/मुख्याध्यापक स्तरावर अत्यंत तात्पुरत्या स्वरुपात करण्यात आलेली होती.

आजमितीस आदिवासी विकास विभागामध्ये आयुक्त आदिवासी विकास यांच्या अंतर्गत ४ अप्पर आयुक्तांच्या कार्यक्षेत्रात रोजंदारी/तासिका तत्वावरील ३८३३ शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी नियुक्त करण्यात आलेले आहेत. हे कर्मचारी मागील १० ते १५ वर्षापासून कार्यरत आहेत. अशा कर्मचाऱ्यांपैकी ३६५ कर्मचाऱ्यांनी ४६ याचिका विविध न्यायालयांमध्ये दाखल केल्या होत्या. त्यापैकी ४ न्यायालयीन प्रकरणात (रिट याचिका क्र.७३५१/२०१२, रिट

याचिका क्र.२१९४/२०१३, रिट याचिका क्र.२१९६/२०१३, रिट याचिका क्र.५८६७/२०१५) मा. उच्च न्यायालयाने दि.३१.१०.२०१८ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयात १० वर्षापेक्षा जास्त कालावधी झालेल्या याचिकाकर्त्यांच्या सेवा नियमित करण्याबाबतचे आदेश दिले आहेत. मा.सर्वोच्च न्यायालयानेही मा.उच्च न्यायालयाचे आदेश कायम ठेवले आहेत. ही बाब विचारात घेवून वर नमूद ४ रिट याचिकांमधील ९८ शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांपैकी मा. उच्च न्यायालयाने ठरवून दिलेले निकष पूर्ण करणाऱ्या शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना शासकीय सेवेत नियमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णयः-</u>**

१. रिट याचिका क्र. ७३५१/२०१२, रिट याचिका क्र.२१९४/२०१३, रिट याचिका क्र.२१९६/२०१३ व रिट याचिका क्र.५८६७/२०१५ मधील ९८ याचिकाकर्त्यापैकी जे शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद यांनी दि.३१.१०.२०१८ रोजी दिलेल्या आदेशातील नमूद बाबींची पूर्तता करीत असतील अशा कर्मचाऱ्यांना मा.न्यायालयाच्या निर्णयात नमुद केल्याप्रमाणे नियमितीकरणाचे लाभ देण्याचा निर्णय घेण्यात येत आहे.

२. संबधित नियुक्ती प्राधिकारी (अपर आयुक्त/ प्रकल्प अधिकारी) यांनी, मा. उच्च न्यायालयाचे व मा. सर्वोच्च न्यायालयाचे आदेश विचारात घेऊन, तसेच संबधित कर्मचाऱ्यांच्या सेवा कालावधी, बिंदु नामावली तसेच रिक्त पदे विचारात घेऊन सदर नियमितीकरणाचे सविस्तर आदेश पारित करावेत. या अनुषंगाने शासनाच्या आरक्षणाबाबतच्या/बिंदूनामावलीबाबतच्या शासननिर्णयातील तरतूदींचे पालन करण्यात यावे. शिक्षक कर्मचाऱ्यांची बिंदूनामावली अपर आयुक्त स्तरावर तसेच शिक्षकेतर वर्ग-४ कर्मचाऱ्यांची बिंदूनामावली प्रकल्प अधिकारी स्तरावर ठेवण्यात येते. वरीलप्रमाणे नियमितीकरणानंतर संबंधित कर्मचाऱ्यांना संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्याने त्या त्या प्रवर्गाच्या बिंदूवर सामावून घ्यावे.

३. मा. सर्वोच्च न्यायालयाने त्यांच्या आदेशात नमुद केल्याप्रमाणे नियमितीकरण करण्यात येणाऱ्या शिक्षक कर्मचाऱ्यांनी त्यांचे नियमितीकरण केल्याच्या दिनांकापासून पाच वर्षाच्या कालावधीत शिक्षक पात्रता परीक्षा (TET) उत्तीर्ण होणे अनिवार्य आहे. अन्यथा शासनाकडून त्यांच्या सेवा समाप्त करण्यात येतील.

४. वरील ९८ कर्मचाऱ्यांपैकी नियमितीकरणास पात्र असलेल्या कर्मचाऱ्यांच्या बाबतीत मा.उच्च न्यायालयाच्या आदेशातील (i) ते (iii) मध्ये नमुद केलेल्या दिनांकापासून नियमितीकरण करण्यात यावे. संबंधित कर्मचाऱ्यांच्याबाबत निश्चित करण्यात आलेल्या नियमितीकरणाच्या दिनांकापासूनची सेवा सर्व प्रत्यक्ष लाभासाठी ग्राह्य मानण्यात येईल. त्यापूर्वीच्या सेवेचे कोणतेही लाभ संबंधित कर्मचाऱ्यांना अनुज्ञेय होणार नाहीत. उदा. संबंधित कर्मचाऱ्यांची सेवाज्येष्ठता त्यांच्या नियमितीकरणाच्या दिनांकापासून लागू करण्यात येईल.अशा प्रकारे सेवा नियमित करण्यात आलेल्या रोजंदारी/तासिका तत्वावरील कर्मचाऱ्यांची एकाच तारखेस नियमितीकरण करण्यात आले असल्यास त्यांची अंतर्गत सेवाज्येष्ठता त्यांच्या रोजंदारी/तासिका तत्वावरील नियुक्तीच्या ज्येष्ठतेप्रमाणे निश्चित करण्यात यावी.

५. मा. उच्च न्यायालयाच्या आदेशातील (iii) मध्ये नमूद केल्यानुसार, नियमितीकरण केलेल्या कर्मचाऱ्यांना दि.०१.११.२०१८ पुर्वीचे कोणतेही आर्थिक लाभ लागू होणार नाहीत. नियमित वेतनश्रेणी अनुज्ञेय करतांना ती संबंधित पदाच्या वेतनश्रेणीच्या किमान टप्प्यावर निश्चित करण्यात यावी.

६. पात्र रोजंदारी/तासिका तत्वावरील कर्मचाऱ्यांना नियमित करतांना सदर पदाच्या सेवाप्रवेश नियमातील वयोमर्यादेची अट लागू राहणार नाही.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०४१२१६२३४१७९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MANOHAR RAMCHANDRA PARKAR

Digitally signed by MANOHAR RAMCHANDRA PARKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=c4c0810e9c94cf92d42a36d93c8f7b6ac18542c1ee758c9cfddcea906d9cf544, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FB43688343316856C0F7E793462127AA87FCE45724E87929C6889798CD7D2C62, cn=MANOHAR RAMCHANDRA PARKAR
Date: 2022.04.12 16:25:40 +05'30'

**(म. रा. पारकर)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल याचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/ विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.

६. मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा. मुख्य सचिव, अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई
९. सचिव, आदिवासी विकास याचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
११. आयुक्त आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
१२. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/ नाशिक / अमरावती/ नागपुर.
१३. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
१४. विभागीय आयुक्त, मुंबई/पुणे/ नाशिक / औरंगाबाद / अमरावती / नागपूर
१५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेया महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१६. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र २. मुंबई नागपूर
१७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१८. सर्व उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. सर्व अवर सचिव/ कक्ष अधिकारी आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२०. निवड नस्ती (कार्यासन (१५).